दिनांक १/१/२००१ रोजी किंवा त्यापूर्वी निवड प्रक्रिया सूरु झालेल्या तसेच सध्या शासन सेवेत असलेल्या. अधिकारी कर्मचा-यांनी संगणक हाताळणी / वापरा बाबतचे प्रमाणपत्र विहित मुदतीत प्राप्त न केल्यास अशाबाबत करावयाची उपाय योजना

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- प्रशिक्षण-२०००/प्रक्र ५/२००१/३९**

**सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई**

**दिनांक : २० जुलै,२००२**

वाचावे :- १)शासन निर्णय क्रमांक सीओएम-१०९८/प्र.क्र.२९/१९९८/३९ दिनांक २४/०३/१९९८

२) सामान्य प्रशासन विभाग अधिसुचना क्रमांक सेप्रनि १०९८/प्रक्र ७/९८/१२, दिनांक २५/०१/९९

३) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्रमांक सेप्रनि १०९८/प्रक्र ७/९८/१२, दिनांक ०३/०५/२०००

४) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक प्रशिक्षण १०००/प्रक्र १४३/३९,दिनांक १०/०७/२०००

५) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय, क्रमांक प्रशिक्षण २००१ /प्रक्र ६१/२००१/३९,दिनांक ०७/८/२००१

**प्रस्तावना :-**

शासकीय कामाकाजाचे दोन वर्षांच्या आत संगणकीकरण करण्याबाबत शासनाने निर्णय घेतलेला असल्याने त्या अनुषंगाने शासकीय कामाकाजात संगणकाचा परिणामकारकरित्या वापर होण्यासाठी प्रशिक्षित अधिकारी /कर्मचारी उपलब्ध होण्यासाठी प्रशिक्षण खर्च व प्रोत्साहनात्मक रक्कम देण्याचाही निर्णय घेण्यात आला. त्यामुळे ज्या शासकीय अधिकारी /कर्मचाऱ्यांनी प्रोत्साहनात्मक रक्कम व प्रशिक्षण खर्च घेतलेला आहे अथवा अशा रक्कमेची मागणी केलेली आहे त्यांनी महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळामार्फत घेतली जाणारी चाचणी परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक करण्यात आले आहे.

ज्याप्रमाणे शासकीय कार्यालयात मराठीचा १००% वापर होण्यासाठी शासनाने मराठी भाषेची परीक्षा उत्तीर्ण होणे बंधनकारक केलेले आहे. त्याचप्रमाणे शासकीय कार्यालयात संगणकाचा १००% वापर होणे गरजेचे असल्याने शासकीय अधिकारी /कर्मचाऱ्यांना संगणक हाताळणी /वापराबाबतचे ज्ञान असणे आवश्यक केलेले आहे. शासकीय अधिसूचना क्रमांक सेप्रनि १०९८/प्र.क्र. ७/९८/१२, दिनांक २५ जानेवारी १९९९ अन्वये शासकीय सेवेतील गट 'अ', गट 'ब' व गट 'क' या पदांवर नियुक्ती करीता संगणक हाताळणी/ वापराबाबतचे ज्ञान आवश्यक अर्हता म्हणून ठरविण्यासाठी " महाराष्ट्र नागरी सेवा (संगणक हाताळणी /वापराबाबतचे ज्ञान आवश्यक ठरविण्याबाबत ) नियम १९९९" अधिसूचित करण्यात आलेले आहेत. शासन राजपत्र दि. ३ मे, २००० अन्वये या विनियमांना दि. १ जानेवारी २००१ पासून प्रभाव देण्यात आला आहे. सदर नियमान्वये शासकीय सेवेतील गट 'अ', गट 'ब' व गट 'क' मधील अधिकारी/कर्मचारी यांना दोन वर्षांच्या आत शासनमान्य संगणक संस्थेचे प्रमाणपत्र सादर करण्याचे निर्देश देण्यात आलले आहेत.

ज्या अधिकारी /कर्मचाऱ्यांनी शासनाने नेमून दिलेल्या खाजगी संगणक संस्थेकडून संगणक प्रशिक्षणाची विहित प्रमाणपत्रे प्राप्त करुन शासनाकडून प्रशिक्षण खर्च व प्रोत्साहनात्मक रक्कम घेतलेली आहे किंवा अशा रक्कमेची मागणी केलेली आहे, अशा अधिकारी /कर्मचाऱ्यांसाठी महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळामार्फत निकष ठरवून चाचणी परीक्षेचे आयोजन केलेले आहे. त्याच प्रमाणे दि. १/१/२००१ रोजी किंवा त्यानंतर सुरु होणाऱ्या निवड प्रक्रियेतील नवीन नेमणूकीसाठी तसेच ज्या अधिकारी/कर्मचाऱ्यांची निवड प्रक्रिया दिनांक १/०१/२००१ पुर्वी सुरु झालेली आहे अशांसाठी तसेच जे अधिकारी/कर्मचारी सध्या शासन सेवेत आहेत अशांसाठी डी.ओ.ई.ओ.सी.सी. चे "सी.सी.सी." किंवा "ओ" स्तर

किंवा "ओ" स्तर किंवा "बी" स्तर किंव "सी" स्तर पैकी एक परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र किंवा महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाची एमएस-सीआयटी परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र सादर करण्याबाबत शासन निर्णय सा. प्र. वि. क्र. प्रशिक्षण २००१/प्र.क्र. ६१/२००१/३९, दिनांक ०७/०८/२००१ अन्वये आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत.

शासकीय कामकाजात संगणकाचा मोठया प्रमाणात वापर होण्याच्या दृष्टीने शासकीय सेवेत असलेल्या तसेच ज्यांची नियड प्रक्रीया दिनांक १/१/२००१ रोजी किंवा त्यापूर्वी सुरु झालेली आहे अशा शासकिय अधिकारी/कर्मचा-यांनी संगणक हाताळणी /वापराबाबचे ज्ञान दिनांक ३१/१२/०२ पर्यंत प्राप्त करण्याबाबत दिनांक १०-७-२००० च्या शासन निर्णयात तरतूद करण्यात आलेली आहे. तथापि त्यांनी असे ज्ञान विहित मुदतीत प्राप्त न केल्यास त्यांचे बाबत कोणती उपाययोजना करण्यात यावी या संबधी मात्र वरील दि. १०-७-२००० च्या किंवा दि.७/८/२००१ च्या शासन निर्णयात कोणतीही तरतूद नाही. तसेच डी.ओ.इ.ओ.सी. चे 'सी.सी.सी.' प्रमाणपत्र किंवा महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाचे एम.एस.सी. आय.टी. प्रमाणपत्र परीक्षा उत्तिर्ण करणे या व्यतिरिक्त अन्य कोणकोणत्या मार्गाने शासकीय अधिकारी/कर्मचारी संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान प्राप्त करुन प्रमाणपत्र शासनास सादर करु शकतील याबाबत शासन आता खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय**

१. शासकिय कामकाजाचे पूर्णत: संगणीकरण होऊन शासन गतीमान होण्यासाठी सर्वच शासकिय आधिकारी/कर्मचा-यांना संगणक हाताळणी/वापराबाबतचे ज्ञान अवगत असणे आवश्यक आहे वास्तव सद्या शासकिय सेवेत असलेले शासकिय आधिकारी/कर्मच्या-यांनी तसेच दि.१/१/२००१ रोजी किंवा त्यापूर्वी किंवा दिनांक १-१-२००१ नंतर ज्यांची नियड प्रक्रिया सुरु झालेली असेल अशांनी दि.३१/१२/२००२ पूर्वी संगणक हाताळणी/वापराबाबतचे विहीत प्रमाणपत्र शासन मान्य संगणक संस्थाकडून प्राप्त करुन शासनास सादर करावयाचे आहे. ही दि. ३१-१२-२००२ पूर्वी प्रमाणपत्र सादर करण्याची अट रद्द करुन त्याऐवजी या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक वर्षाच्या आंत विहित संगणक विषयक प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक करण्यात येत आहे. तसेच शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक प्रशिक्षण १०००/प्र.क्र.१४३/३९, दि. १०.७.२००० मधील परि. क्र. १०,११ व १२ मधील अटी रद्द करण्यात येत आहेत. त्या ऐवजी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.६१/२००१/३९,दि. ७.८.२००१ च्या शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे D.O.E.A.C.C. अथवा महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळा मार्फत संगणक हाताळणी / वापराबाबतचे प्रमाणपत्र प्राप्त करण्यात यावे आणि या बरोबरच ज्या शासकीय अधिकारी / कर्मचाऱ्यांची नियड प्रक्रीया दि. १.१.२००१ रोजी किंवा त्यापूर्वी किंवा दिनांक १-१-२००१ नंतर सुरु झाली असेल ते आणि सध्या शासकीय सेवेत असलेले अधिकारी/कर्मचारी खाली नमूद केलेल्या विविध मार्गांनी सुध्दा संगणक हाताळणी/ वापराबाबतचे ज्ञान प्राप्त करुन महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळाच्या एम एस सी आय टी परीक्षेस सरळ बसून आणि ती परिक्षा उत्तीर्ण करुन शासनास प्रमाणपत्र सादर करु शकतील.

I) संगणक ज्ञानाबाबत उपलब्ध पुस्तकाचा स्वत: अभ्यास करुन,
II) इंटरनेटशी जोडलेल्या संगणकाव्दारे प्रगत ज्ञान प्राप्त करुन,
III) संगणक प्रशिक्षण संस्थेमधून संगणक प्रशिक्षण प्राप्त करुन,
IV) सहकाऱ्यांच्या मदतीने कार्यालयात व घरी स्वत: संगणक विषयक ज्ञान प्राप्त करुन,
V) दूर शिक्षण पध्दतीचा अवलंब करुन संगणकाबाबतचे ज्ञान प्राप्त करुन,
VI) संगणक ज्ञान विषयक पदवी/पदवीका प्राप्त करुन,
VII) संबधीत कर्मचा-यांनी अशी पदवी/पदवीका D.O.E.A.C.C. अथवा महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळा मार्फत उत्तीर्ण करुन प्रमाणपत्र प्राप्त केलेली असल्यास त्यांनी महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळा मार्फत घेतल्या जाणाऱ्या एम एस सी आय टी किंवा सी सी सी परीक्षा पुन्हा उत्तीर्ण करणे आवश्यक नाही.

वरील ६ माध्यमाद्वारे प्रशिक्षण घेऊन शासनास प्रमाणपत्र सादर करणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्यांनी एम एस सी आय टी परीक्षा वर नमूद केलेल्या विहित मुदतीत उत्तिर्ण करणे आवश्यक आहे. परंतु ती त्यांनी किती संधीत उत्तिर्ण करावी याबाबत त्यांचेवर कोणतेही बंधन राहाणार नाही.

*Doitpc42\C:\AjitGavhaneFile\Examination2001/ATAK*

H-478-(अे)(5000-07-02)1a

२. एम एस सी आय टी ची परीक्षा महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळामार्फत घेतली जाणार असली तरी त्यासंबंधीचा अभ्यासक्रम, इत्यादी बाबी महाराष्ट्र ज्ञान महामंडळ,मुंबई यांचेमार्फत हाताळल्या जातील.

३. वयाची ५५ वर्षे पूर्ण न झालेल्या गट 'अ', गट 'ब' व गट 'क' मधील शासकीय अधिकारी / कर्मचाऱ्यांनी या आदेशाचे दिनांकापासून १ वर्षाचे आत संगणक हाताळणी / वापराबाबतचे विहित प्रमाणपत्र प्राप्त न केल्यास त्यांच्या बाबत खालीलप्रमाणे उपाय योजना करण्यात यावी :--

(१) ज्यांची निवडप्रक्रिया ०१/०१/२००१ रोजी किंवा त्यापूर्वी पासून सुरु झालेली आहे अशा शासकीय अधिकारी / कर्मचाऱ्यांनी नियुक्तीच्या दिनांकापासून एक वर्षाच्या आंत तसेच सध्या शासकीय सेवेत कार्यरत असलेले अधिकारी / कर्मचाऱ्यांनी वर नमूद केलेल्या १ वर्षाच्या विहित कालावधीत परिक्षा उत्तीर्ण न केल्यास संबंधित अधिकारी/कर्मचारी, उक्त कालावधी समाप्त झाल्यानंतर परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून त्यांना सुट देण्यात येईपर्यंतच्या (वयाची ५५ वर्षे पूर्ण झाल्यास) कालावधीपर्यंत किंवा ते संगणक हाताळणी / वापराबाबतचे विहीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन देईपर्यंत वेतनवाढी रोखण्यास पात्र ठरतील.

टीप :-(१) परीक्षा ज्या तारखेस संपली आहे त्या तारखेच्या लगतनंतरची तारीख ही परीक्षा उत्तीर्ण झाल्याची तारीख असल्याचे समजण्यात येईल.

टीप :-(२) अशा प्रकारे रोखून धरलेल्या वेतनवाढी, शासकीय कर्मचारी ज्या तारखेला परीक्षा उत्तीर्ण होईल किंवा ज्या तारखेला त्याला अशा प्रकारे परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येईल अशा तारखेला देय होतील आणि जणू काही त्याच्या वेतनवाढी रोखल्या गेल्या नव्हत्या असे समजून त्या उपार्जित होतील, परंतु वेतनवाढी रोखून धरल्यामुळे देय होणारी थकबाकी मिळण्याचा त्याला हक्क असणार नाही.

(२) ज्या अधिकारी/कर्मचाऱ्यांची निवड प्रक्रिया दिनांक ०१/०१/२००१ रोजी किंवा त्यापुर्वी सुरु झालेली आहे, अशा अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या नियुक्ती आदेशात अशी अट घालण्यात यावी की, त्यांनी नियुक्तीच्या दिनांकापासून एक वर्षाच्या आंत संगणक हाताळणी/वापराबाबतचे विहीत प्रमाणपत्र उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. त्यामध्ये अशीही एक जादा अट घालून असे नमूद करण्यात यावे की, जर त्यांनी या मुदती पूर्वी विहित प्रमाणपत्र उपलब्ध करुन दिले नाही तर अशा अधिकारी/कर्मचाऱ्यांना उक्त कालावधी संपताच सेवेत कायम करण्यात येणार नाही व या बाबत त्यांचे कोणतेही निवेदन विचारात घेतले जाणार नाही, अथवा परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून कोणालाही सूट दिली जाणार नाही. अथवा परीक्षा उत्तीर्ण होण्यास मुदतवाढही दिली जाणार नाही.

(३) वर नमूद केलेल्या विहित १ वर्षाच्या कालावधीनंतर मात्र ज्या अधिकारी/कर्मचाऱ्यांनी संगणक हाताळणी/वापराबाबतचे विहीत प्रमाणपत्र प्राप्त केलेले असेल अशा अधिकारी /कर्मचाऱ्यांचाच पदोन्नतीसाठी विचार करण्यात येईल. तथापि जे अधिकारी/कर्मचारी वयाची ५५ वर्षे पूर्ण करत असतील त्यांना ही अट लागू राहणार नाही.

४. यापुढे परीक्षेसाठी जे शुल्क आकारले जाईल त्यापोटी जास्तीत जास्त रु. ३००/- (रु. तीनशे फक्त) इतकी रक्कम संगणक हाताळणी/वापराबाबतची विहित परीक्षा उत्तिर्ण करुन विहित प्रमाणपत्र सादर करणाऱ्या अधिकारी/कर्मचाऱ्यांना अदा करण्यात येईल. सबब संदर्भीय क्र. ४ येथील दि. १०.७.२००० च्या शासन निर्णयातील परिच्छेद ७ मध्ये नमूद केलेली प्रशिक्षण खर्चासाठीची रु. २५००/- रक्कम देण्याची अट रद्द करण्यांत येत आहे. त्याच प्रमाणे एका संगणकासाठी २ कर्मचारी प्रशिक्षित करण्याबाबतची १०.७.२००० च्या शासन निर्णयातील अट क्र. २ व ३ रद्द करण्यात येत आहे.

५. हे आदेश तरोच्र शा.नि.सा.प्र.वि.क्र. प्रशिक्षण१०००/प्रक्र१४३/३९ दिनांक १०/७/२००० आणि शा.नि.सा.प्र.वि.क्र.प्रशिक्षण२०००/प्रक्र६१/२००१/३९ दि.७/८/२००१ च्या शासन निर्णयातील सर्व तरतुदी शासकिय, निमशासकिय कार्यालये, जिल्हा परिषदा, महानगर पालिका,नगर पालिका, महामंडळे, मंडळे, स्थानिक स्वराज्य संस्था व शासनाच्या अधिनिस्त आणि शासनास सलग्न संस्था इत्यादी मधील सर्व अधिकारी / कर्मचा-यांना लागू होतील. मंत्रालयीन प्रशासकीय विभाग तरोच जिल्हा परिषदा, महानगर पालिका, नगर पालिका, महामंडळे, मंडळे, स्थानिक

*Doitpc42\C:\AjitGavhaneFile\Examination2001/ATAK*

स्वराज्य संस्था व शासनाच्या अधिनिस्त आणि शासनास सलग्न संस्था इत्यादींनी या बाबतचा खर्च त्यांच्या वार्षीक योजनेतील मंजूर नियतव्ययातून भागवावा.

हे आदेश सामान्य प्रशासन विभाग सेवा उपविभाग व वित्त विभागाच्या संमतीने व त्या विभागाचा अनौ. संदर्भ क्र. २६१, दि. १७-१-२००२ अन्वये निर्गमित करण्यांत येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने

(एन.आर.गद्रे)
संचालक तथा उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा) मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा) मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,(विधान परिषद /विधान सभा),मुंबई,
महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र , नागपूर,
महालेखापाल -१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल -२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र , नागपूर,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,
पोलीस महासंचालक, मुंबई,
सर्व पोलीस उप महासंचालक,
सर्व पोलीस आयुक्त,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व महानगर पालिकांचे आयुवत,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र ज्ञान महामंडळ मर्यादित,पहिजा मजला, व्यवसाय शिक्षण प्रशिक्षण इमारत, ३ महानगरपालिका मार्ग, मुंबई-४०० ००१,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व नगरपालिकांचे मुख्याधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / लेखा कोष भवन वांद्रे (पू.) मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती (२ प्रती).